**महाराष्ट्र शासन**

**क्रमांक :** मावज २००९/प्र.क्र४५७/०९/३४-अ,
सामान्य प्रशासन विभाग,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२,
**दिनांक :** ११/१०/२०१०.

# आदेश

महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्याचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ मधील कलम ४ (४) (दोन) अन्वये माहिती व जनसंपर्क महासंचालनालय (मुख्यालय), मंत्रालय, मुंबई येथील गट-अ संवर्गातील खाली नमूद केलेल्या अधिकाऱ्याची सक्षम प्राधिकाऱ्यांच्या मान्यतेने कामकाजाच्या व प्रशासकीय सोयीच्या दृष्टीने खालील स्तंभ-४ मध्ये दर्शविलेल्या ठिकाणी बदलीने पदस्थापना करण्यात येत आहे.

| अ.क्र. (१) | अधिकाऱ्याचे नाव (२) | सध्याचे पद व ठिकाण (३) | बदलीचे पद व ठिकाण (४) |
|---|---|---|---|
| १ | श्री.र.दे.वसावे, | जिल्हा माहिती अधिकारी, वाशिम. | जिल्हा माहिती अधिकारी, जळगाव. |

२. वरील अधिकाऱ्याला बदलीच्या पदावर रुजू होण्यासाठी **तत्काळ** कार्यमुक्त करण्यात यावे. सदर अधिकाऱ्यांने त्याच्या नावासमोर स्तंभ-४ मध्ये दर्शविलेल्या पदावर रुजू होऊन आवश्यक अहवाल सर्व संबंधीत कार्यालयांस तसेच शासनास विनाविलंब सादर करावा. हे आदेश तत्काळ अंमलात येतील. बदली झालेल्या अधिकाऱ्याची बदलीनंतरच्या पदस्थापनेत बदल करण्यासंबंधीच्या कोणत्याही विनंतीची दखल घेण्यात येणार नाही व त्या संदर्भात कोणत्याही प्रकारे दबाव आणल्यास संबंधीत अधिकाऱ्याविरुध्द महाराष्ट्र नागरी सेवा (वर्तणूक) नियम, १९७९ अन्वये शिस्तभंगाची कारवाई करण्यात येईल.

३. हे आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक **२०१०१०१११८४५५०००१** असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

**(निं. बा. रायलापूरकर)**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

मा. मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव, मुख्यमंत्री सचिवालय, मंत्रालय, मुंबई,
मा. राज्यमंत्री (मावज) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखा व अनुज्ञेयता)/(लेखा व परिक्षा), मुंबई,

( कृ.मा.प. )

महालेखापाल, महाराष्ट्र-२ (लेखा व अनुज्ञेयता) / (लेखा व परिक्षा), नागपूर,
महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई,
संचालक (माहिती) (वृत्त व जनसंपर्क), माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई,
संचालक (माहिती) (प्रशासन), माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई,
अधिदान व लेखाधिकारी, मुंबई,
जिल्हा कोषागार अधिकारी, वाशिम / जळगाव.
निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई,
उपसंचालक (लेखा), माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई,
सर्व विभागीय उपसंचालक (माहिती) / जिल्हा माहिती अधिकारी,
संबंधीत अधिकारी, (मावज मार्फत),
सामान्य प्रशासन विभाग/का.१२, २१ व ३४,
प्रधान सचिव (मावज) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
**निवड नस्ती (का.३४-अ).**